**पुनर्रचित राष्ट्रीय बांबू अभियान (National Bamboo Mission) च्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. बांबूसा-२०१८/प्र.क्र.२२८/फ-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१ जुलै, २०१८

<u>वाचा</u> :- १) केंद्र शासनाच्या कृषी एवं किसान कल्याण मंत्रालयाच्या अर्ध शासकीय पत्र क्रमांक: १५-०१/२०१७ सीसी, दिनांक ०७.०५.२०१८

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई क्रमांक:बांबुसा-२०१८/प्रक्र.२२८/फ-९ दिनांक ६.७.२०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्र शासनाच्या सदर्भाधीन दिनांक ७ मे २०१८ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार केद्र शासनाच्या सन २०१८ च्या अर्थसंकल्पामध्ये "पुनर्रचित राष्ट्रीय बांबू मिशन (NBM)" ची घोषण करण्यात आले आहे. सदर मिशनला केंद्रीय मंत्रीमंडळाच्या आर्थिक समितीने दिनांक २५.०४.२०१८ रोजी मान्यता दिली आहे. याद्वारे संपूर्ण बांबू क्षेत्र शेतक-यांमार्फत औद्योगिक क्षेत्राशी जोडावयाचे आहे. या अंतर्गत शासकीय वनेतर आणि खाजगी क्षेत्रावर बांबूची लागवड करावयाची आहे. केंद्र शासनाने सदर मिशनची प्रभावी अंमलबजावणी करण्याचे ठरविलेले आहे. या अनुषंगाने केंद्र शासनाने मार्गदर्शक सूचना जारी केल्या आहेत. राज्यात बांबू मिशनची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णय अन्वये वन विभाग हा केंद्रस्थ (नोडल) विभाग घोषित केला तसेच व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बाबू विकास मंडळ, नागपूर यांची बांबू अभियान संचालक (Missions Director) यांची नियुक्ती केली आहे. आता, राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC) गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

सदर पुनर्रचित राष्ट्रीय बाबू मिशनकरीता खालीलप्रमाणे राज्यस्तरीय समिती गठित करण्यात येत आहे:-

**राज्यस्तरीय कार्यकारी समिती (SLEC)**

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव(नियोजन) | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव(कृषी) | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ५. | प्रधान सचिव(उदयोग) | सदस्य |
| ६. | प्रधान सचिव(ग्रामविकास) | सदस्य |
| ७. | प्रधान सचिव(आदिवासी विकास) | सदस्य |
| ८. | सचिव(वने) | सदस्य |
| ९. | सचिव(उच्च व तंत्र शिक्षण) | सदस्य |
| १०. | प्रधान मुख्य वनसंरक्षक(वन बल प्रमुख), नागपूर | सदस्य |
| ११. | प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे | सदस्य |
| १२. | प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापक), नागपूर | सदस्य |
| १३. | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन व प्रशिक्षण ), पुणे | सदस्य |
| १४. | केंद्र शासनाच्या कृषी मंत्रालयाचे नामनिर्देशीत प्रतिनिधी | सदस्य |
| १५. | श्री.व्हि.गिरीराज, महाराष्ट्रातील बांबू क्षेत्राचे सशक्तीकरण समिती अध्यक्ष तथा माजी अपर मुख्य सचिव | सदस्य |
| १६. | बांबू क्षेत्रातील दोन तज्ञ * | सदस्य |
| १७. | संचालक, बांबू मिशन तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर | सदस्य सचिव |

**समितीचे कार्यक्षेत्र**

१) राज्याच्या बांबू मिशनच्या कृती आराखडा तयार करणे व राष्ट्रीय स्तरावरील कार्यकारी समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे.

२) केंद्र शासनाकडून मंजूर झालेल्या निधीचे संबंधित यंत्रणांना वितरीत करणे.

३) मिशनच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी योग्य समन्वय / संनियंत्रण व मूल्यमापण करणे.

उपरोक्त समितीतील अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या शासन निर्णय दिनांक ०३.०३.२०१० मधील परिच्छेद क्रमांक १२ अन्वये प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. अशासकीय सदस्यांना विमान प्रवास व रेल्वेच्या वातानुकूलित प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही. तसेच अशासकीय सदस्यांना बैठक भत्ता शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक २४.०५.२०१२ अन्वये केलेल्या सुधारणेस अनुसरुन सुधारीत दराने बैठक भत्ता अनुज्ञेय असेल.

सदर राज्यस्तरीय समिती केंद्र शासनाने मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यात राष्ट्रीय बांबू अभियानाची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरिता कार्यरत राहून कार्यवाही करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७३११७०२४५५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.07.31 17:03:12 +05'30'

**( सुजय दोडल )**
सह सचिव (वने)

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा.मंत्री (वित्त आणि नियोजन, वने) यांचे खाजगी सचिव
४. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव यांचे सहसचिव
६. अपर मुख्य सचिव (वित्त)
७. अपर मुख्य सचिव(वित्त)
८. अपर मुख्य सचिव(नियोजन)
९. अपर मुख्य सचिव(कृषी)
१०. प्रधान सचिव(उदयोग)
११. प्रधान सचिव(ग्रामविकास)
१२. प्रधान सचिव(आदिवासी विकास)
१३. सचिव(वने)
१४. सचिव(उच्च व तंत्र शिक्षण)
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक(वन बल प्रमुख), नागपूर
१६. प्रधान मुख्य वनसरक्षक (सामाजिक वनीकरण), पुणे
१७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापक), नागपूर
१८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन व प्रशिक्षण ), पुणे
१९. सर्व विभागीय आयुक्त
२०. व्ही. गिरीराज माजी अपर मुख्य सचिव
२१. सर्व मुख्य वनसंरक्षक
२२. आयुक्त (कृषी) महाराष्ट्र राज्य, पुणे
२३. संचालक फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य,पुणे

२४. संचालक, खादी व ग्रामोउदयोग मंडळ, मुंबई

२५. संचालक, उदयोग संचलनालय, मुंबई

२६. सर्व जिल्हाधिकारी

२७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद

२८. व्यवस्थापकीय संचलाक, महाराष्ट्र बांबु विकास मंडळ, नागपूर

२९. महालेखापाल (लेखापरिक्षा ) महाराष्ट्र एक व दोन, मुंबइ्र व नागपूर

३०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र एक व दोन, मुंबई व नागपूर

३१. सर्व जिल्हा कोषगार अधिकारी

३२. सर्व मंत्रालयीन विभाग

३३. मुख्य वनंसरक्षक(मंत्रालय), मुंबई

३४. सर्व सह सचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकरी, महसूल व वन विभाग, (वने), मंत्रालय, मुंबई

३५. कार्यासन फ-९ , महसूल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई -३२ (निवडनस्ती).